राज्यस्तरीय योजनेंतर्गत गोवर्धन गोवंश
सेवा केंद्र ही नवीन योजना सुरू करण्यास
मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पविआ-२०१६/प्र.क्र.११४/पदुम-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक: २६ एप्रिल, २०१७**

**प्रस्तावना :-**

राज्यात दि.४ मार्च, २०१५ पासून महाराष्ट्र प्राणी रक्षण (सुधारणा) अधिनियम, १९९५ लागू करण्यात आला आहे. या कायद्यानुसार संपूर्ण गोवंशीय प्राण्यांच्या कत्तलीवर प्रतिबंध करण्यात आलेला आहे. त्यामुळे शेतकामासाठी, ओझी वाहण्यासाठी व पैदाशीसाठी उपयुक्त नसलेले गोवंशीय बैल व वळू यांच्या कत्तलीवर बंदी घालण्यात आलेली आहे. तसेच, गाय, बैल, वळू यांच्या कत्तलीसाठी परराज्यात करावयाची वाहतूक व तदनुषंगीक खरेदी / विक्री करण्यास देखील प्रतीबंध करण्यात आलेला आहे. परिणामी, कालांतराने शेती व दूध यासाठी अनुत्पादक असलेल्या गोवंशीय पशुधनाच्या संख्येत वाढ होणार असून, या सर्व पशुधनाचा सांभाळ / संगोपन करणे आवश्यक ठरणार आहे.

२. मा. मंत्री (वित्त) यांनी सन २०१६-१७ चा अर्थसंकल्प विधीमंडळात सादर करतांना दि. १८ मार्च, २०१६ रोजी गोवर्धन गोवंश सेवा केंद्र सुरू करण्याची घोषणा केलेली असून, ती खालील प्रमाणे आहे.

"महाराष्ट्रातील ३४ ग्रामीण जिल्ह्यांमध्ये भाकड गाई व गोवंश संगोपनासाठी मी "गोवर्धन गोवंश रक्षा केंद्र" ही नवीन योजना जाहीर करत असून, या क्षेत्रात अनुभव असलेल्या स्वयंसेवी संस्थांमार्फत ही योजना राबविली जाईल. यासाठी, अशा संस्थांना एकरकमी १ कोटी रुपये अनुदान देण्यात येईल. तसेच, त्याठिकाणी उपलब्ध असल्यास आवश्यकतेनुसार शासकीय जमिन देण्यात येईल. या गोवर्धन गोवंश रक्षा केंद्रासाठी सन २०१६-१७ करीता ३४ कोटी रुपये इतका नियतव्यय प्रस्तावित आहे."

३. राज्यस्तरीय योजनेअंतर्गत **गोवर्धन गोवंश सेवा केंद्र** ही नवीन योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर हे २ जिल्हे वगळता उर्वरीत ३४ ग्रामीण जिल्ह्यात राबविण्यासाठी दिनांक- ६ एप्रिल, २०१७ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर योजना राज्यात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

४. गोवंशाचा सांभाळ (भाकड गाई, अनुत्पादक / निरुपयोगी बैल, वळू इ.) करण्यासाठी गोशाळांना अर्थसहाय्य देण्यासाठी राज्यस्तरीय योजनेअंतर्गत गोवर्धन गोवंश सेवा केंद्र ही नवीन योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर हे २ जिल्हे वगळता उर्वरीत ३४ ग्रामीण जिल्ह्यात राबविण्यासाठी याद्वारे शासन मान्यता देत आहे.

**५. योजनेचे उद्देश :-**

**अ)** दुग्धोत्पादनास, शेतीकामास, पशु-पैदाशीस, ओझी वाहण्याच्या कामास उपयुक्त नसलेल्या / असलेल्या गाय, वळू, बैल गोवंश यांचा सांभाळ करणे.

**ब)** अशा पशुधनासाठी चारा, पाणी व निवाऱ्याची सोय उपलब्ध करुन देणे.

**क)** गोवर्धन गोवंश सेवा केंद्रामधील पशुधनासाठी आवश्यक असलेल्या वैरणीसाठी वैरण उत्पादन कार्यक्रम राबविणे.

**ड)** गोमूत्र, शेण इ. पासून विविध उत्पादने, खत, गोबरगॅस व इतर उप-पदार्थांच्या निर्मितीस प्रोत्साहन व संशोधनास /चालना देणे.

**६. लाभार्थी निवडीचे निकष / अटी व शर्ती :-**

१. सदरची संस्था धर्मादाय आयुक्त यांच्याकडे नोंदणीकृत असावी.

२. संस्थेस गोवंश संगोपनाचा कमीत कमी ३ वर्षाचा अनुभव असावा.

३. केंद्रावर असलेल्या पशुधनास आवश्यक असलेली वैरण / चारा उत्पादनासाठी तसेच पशुधन संगोपनासाठी संस्थेकडे स्वत:च्या मालकीची अथवा ३० वर्षाच्या भाडेपट्टयावरची किमान १५ एकर जमीन असावी.

४. संस्थेने या योजनेंतर्गत मागणी केलेल्या एकूण अनुदानाच्या कमीत कमी १० टक्के एवढे खेळते भाग-भांडवल संस्थेकडे असणे आवश्यक आहे.

५. संस्थेचे नजीकच्या मागील ३ वर्षाचे लेखापरिक्षण झालेले असणे आवश्यक आहे.

६. संस्थेस गोसेवा / गो-पालनाचे कार्य करण्यासाठी शासनासोबत करारनामा करण्याचे बंधनकारक राहील.

७. संबंधीत संस्थेचे राष्ट्रीयकृत बॅकेत खाते असणे आवश्यक आहे.

८. संस्थेवर कार्यरत कर्मचारी / मजूर यांचे वेतन इत्यादीचा खर्च संस्थेकडून अदा करण्यासाठी संस्था आर्थिकदृष्टया सक्षम असावी.

९. या योजनेंतर्गत ज्या बाबीसाठी अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल, त्याच बाबीसाठी भविष्यात नव्याने कोणतेही अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

१०. ज्या संस्थांकडे पशुधनाच्या देखभालीसाठी व चाऱ्यासाठी स्वत:च्या उत्पनाचे साधन आहे, अशा संस्थांना प्राधान्य देण्यात येईल.

११. राज्यस्तरावरील समितीची पूर्वपरवानगी घेऊन केवळ नवीन मूलभूत सुविधा निर्माण करण्याकरिताच सदर योजनेत रु. १.०० कोटी इतके अनुदान अनुज्ञेय राहील.

१२. राज्यस्तरावरील समितीची पूर्वपरवानगी घेतल्याशिवाय मूलभूत सुविधा निर्माण केल्यास, अशा बाबींसाठी सदर योजनेत अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

**७. <u>या योजनेमध्ये प्रामुख्याने खालील मुलभूत सुविधांकरीता अनुदान देय ठरेल:-</u>**

(अ) पशुधनासाठी नवीन शेडचे बांधकाम, चाऱ्याची, पिण्याची पाण्याची व्यवस्था व वैरण उत्पादनासाठी पाण्याच्या उपलब्धेकरिता विहीर / बोअरवेल, चारा कटाई करण्यासाठी विद्युतचलित कडबाकुट्टी यंत्र, मुरघास प्रकल्प, गांडूळखत निर्मिती प्रकल्प, गोमूत्र, शेण यापासून उत्पादन निर्मिती प्रकल्प व विक्री केंद्र इत्यादी, अशा प्रकारच्या मुलभूत सुविधांकरीता अनुदान देण्यात यावे. याकरिता संस्थांच्या प्रस्तावामध्ये वरील बाबींचा समावेश करण्यात यावा. जुन्या शेडच्या दुरूस्तीकरिता या योजनमधून अनुदान मिळणार नाही.

(ब) कृषि / पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र शासन, राज्य शासन व जिल्हास्तरीय विविध योजनांमधून, चारा उत्पादनांच्या योजनामधून या गोशाळांना वैरण लागवडीसाठी बियाणे, खते, ठोंबे, हायड्रोपोनीक, वाळलेला चारा उत्पादन / ओला चारा उत्पादन करण्यासाठी लाभ अनुज्ञेय राहतील.

(क) तसेच विद्युत जोडणी आवश्यक असल्यास "कृषि / कृषिपंप" या बाबी अंतर्गत प्रचलित योजनेमधून या गोशाळांनी विद्युत जोडणी प्राप्त करुन घ्यावी. या लाभासाठी प्रस्तुत योजनेमधून अनुदान देय होणार नाही.

(ड) याशिवाय या गोशाळांनी रुग्ण पशुधनास आवश्यक असलेल्या पशुवैद्यकीय सेवा जवळच्या पशुवैद्यकीय दवाखान्यामार्फत उपलब्ध करुन घ्याव्यात.

**८. <u>"गोवर्धन गोवंश सेवा केंद्र" या योजनेतंर्गत लाभार्थी गोशाळांची निवड</u> :-**

या योजनेंतर्गत अनुदान द्यावयाच्या आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे आणि गोशाळेची निवड करण्याचे अधिकार राज्यस्तरावरील मा.मंत्री (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या खालील समितीस प्रदान करण्यात येत आहेत.

**९. सदर समितीची संरचना खालीलप्रमाणे:-**

| | |
|---|---|
| (१) मा. मंत्री (पदुम) | अध्यक्ष |
| (२) प्रधान सचिव / सचिव (पदुम) | सदस्य |
| (३) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| (४) प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव (वित्त) यांनी नामनिर्देशीत केलेला उपसचिवांपेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | सदस्य |

(५) प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव (नियोजन) यांनी नामनिर्देशीत केलेला उपसचिवांपेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी — सदस्य

(६) तीन अशासकीय सदस्य — सदस्य

(७) उप सचिव / सह सचिव (पशुसंवर्धन) — सदस्य सचिव

१०. सदर समितीवरील अशासकीय सदस्यांची नेमणूक शासनच्या मान्यतेने करण्यात येईल.

११. या योजनेतील बांधकाम, विद्युत्तीकरण, पाणीपुरवठ्यासाठी विहीर इत्यादी तांत्रिकदृष्ट्या योग्य असल्याची मान्यता जिल्हास्तरावरील सार्वजनिक बांधकाम विभागाकडून घ्यावी.

१२. सदर योजनेची राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर हे दोन जिल्हे वगळता उर्वरीत ३४ ग्रामीण जिल्ह्यांसाठी प्रति जिल्हा रु. १.०० कोटी एकरकमी अनावर्ती अनुदान या प्रमाणे ३४ जिल्ह्यांसाठी रु. ३४.०० कोटी एवढे अनुदान राज्यस्तरीय योजनेंतर्गत उपलब्ध करुन देण्यात येईल.

१३. ही योजना वित्तीय वर्ष सन २०१७-१८ या वर्षापासून राबविण्यात येईल. ज्या संस्थेस सदर योजनेचा लाभ मिळालेला आहे, अशा संस्थेस भविष्यात या योजनेतून लाभ अनुज्ञेय होणार नाही.

१४. लाभार्थींनी या संदर्भातील प्रस्ताव संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्याकडे सादर करावा.

१५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी त्यांचेकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावांची प्राथमिक छाननी करुन, प्रस्ताव पुढील कार्यवाहीसाठी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे पाठवावा.

१६. आयुक्त पशुसंवर्धन यांनी प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करुन आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायासह, प्रस्ताव राज्यस्तरीय समितीच्या मान्यता घेण्यासाठी शासनास सादर करावा.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२६१७२२३५१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.04.27 11:05:21 +05'30'

**( विकास तु. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे- ७.

३. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
१०.सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
११.सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४.निवड नस्ती (पदुम- ३).